**अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द) मार्फत खरेदी करण्यात आलेल्या व निर्लेखित केलेल्या शासकीय वाहन क्रमांक एमएच-०१-एएन ०७८६ (Ambassador १८०० ISZ) च्या विक्रीबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.अविवि २०२०/ प्र.क्र.१३/का.३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १५ सप्टेंबर, २०२०

<u>संदर्भ :-</u> (१) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र.शापसे/वा.त./२०१७/१२५३,दि.२०.४.२०१७
(२) अल्पसंख्याक विकास विभाग ज्ञापन क्र. वाहन २०१७/प्र.क्र.६६/का.३, दि. २९ एप्रिल, २०१७
(३) वित्त विभाग परिपत्रक क्र.डीएफपी१०९१/प्र.क्र.४/विनियम दि.१८.६.१९९१.
(४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. वाहन २०१३/प्र.क्र.३१/१३/विनियम, दि.२०.९.२०१३
(५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक डीएफपी१०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम दिनांक २२.६.२०१६
(६) सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय शासन निर्णय क्र.मातंसं ०८०/६/२०१३-DIR-DIT(MH)/३९, of. ३.१२.२०१४

**<u>प्रस्तावना :-</u>**

अल्पसंख्याक विकास विभागामार्फत माहे एप्रील, २०१० मध्ये विहीत कार्यपध्दती अवलंबून रु.४८५२९८/- इतक्या किंमतीस खरेदी करण्यात आलेले आणि तत्कालीन मा.मंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे वापरात असलेले शासकीय वाहन क्रमांक एमएच ०१ एएन ०७८६ (Ambassador १८०० ISZ) संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दिनांक २९.४.२०१७ च्या ज्ञापनान्वये निर्लेखित करण्यात आले. सदर वाहनाच्या विक्रीसाठी वित्त विभागाची दिनांक १८.६.१९९१, दिनांक २०.९.२०१३ आणि दिनांक २२.६.२०१६ ची संदर्भीय शासन परिपत्रके, सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांचा संदर्भीय दि. ३.१२.२०१४ चा शासन निर्णय यातील मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहून विहीत कार्यपध्दती अवलंबण्यात आलेली आहे.

२. निविदा सादर करावयाच्या कालावधीत विहीत पध्दतीने मोहोरबंद लिफाफ्यांमधून खालील २ निविदा या विभागाकडे प्राप्त झाल्या आहेत :-

निविदा क्र.१- श्री. ए लतिफ के. पटेल, मुंबई- १५२००/-
निविदा क्र.२-श्री.विनायक संभाजी पांगे, मुंबई- ११,७८६/-

यामध्ये श्री. ए. लतिफ के. पटेल, मुंबई यांची निविदा अधिकतम किंमतीची आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भीय शासन परिपत्रक दिनांक २२.६.२०१६ मधील परि. ३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभागास, विभागाच्या ताब्यातील निर्लेखित केलेल्या शासकीय वाहनाच्या विक्रीबाबतचे अधिकार देण्यात आले आहेत.

४. सदर वाहन हे अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द) मार्फत विभागाचे मा.मंत्री यांचेसाठी खरेदी करण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द) हाच प्रशासकीय विभाग असल्यामुळे सदर वाहनाची विक्री या विभागामार्फत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाकडून आता खालीप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक विकास विभागामार्फत खरेदी करण्यात आलेले आणि संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दिनांक २९.०४.२०१७ च्या ज्ञापनान्वये निर्लेखित करण्यात आलेल्या शासकीय वाहन क्रमांक एमएच -०१-एएन-०७८६ (Ambassador १८०० ISZ) ची विक्री करण्यास खालीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे :-

अ. वित्त विभागाची संदर्भीय अनुक्रमांक ३,४ आणि ५ येथील शासन परिपत्रकांमधील मार्गदर्शक सूचनांनुसार विहीत कार्यपध्दती अवलंबून वाहन विक्रीसाठी आलेली निविदेची किंमत हातच्या किंमतीपेक्षा कमी येत असल्यास निविदा स्विकारण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द) हाच प्रशासकीय विभाग असल्यामुळे विभागाकडे प्राप्त झालेल्या २ निविदांपैकी अधिकतम किंमतीची निविदा सादर केलेले श्री. ए. लतिफ के. पटेल, मुंबई यांची रु.१५,२००/- इतक्या रकमेची निविदा स्विकारण्यास आणि त्यास अनुसरून शासकीय वाहन क्रमांक एमएच -०१-एएन-०७८६ (Ambassador १८००ISZ) या वाहनाची "वाहन जसे आहे त्या स्थितीत" रु.१५२००/- (रुपये पंधरा हजार दोनशे फक्त) इतक्या किंमतीस विक्री करण्यास याअन्वये मान्यता देण्यात येत आहे.

ब. निविदा सादर केलेले अन्य १ निविदाकार, श्री. विनायक संभाजी पांगे,मुंबई यांनी निविदेसाठी भरणा केलेली इसाऱ्याची रक्कम रु.५००/- इतकी रक्कम त्यांना परत करण्यास याअन्वये मंजूरी देण्यात येत आहे.

क. श्री. ए. लतिफ के. पटेल, मुंबई यांनी निविदा सादर करताना भरणा केलेली इसाऱ्याची रु.५००/- इतकी रक्कम निविदेच्या रु.१५,२००/- इतक्या रकमेमधून वजा करून उर्वरित रु.१४,७००/- (अक्षरी रुपये चौदा हजार सातशे फक्त ) रकमेचा भरणा विभागाच्या रोखशाखेमध्ये करण्यास निविदाकार श्री. ए. लतिफ के. पटेल, मुंबई यांना मंजूरी देण्यात येत आहे. सदर रकमेचा भरणा रोखशाखेमार्फत शासन कोषागारात करण्यात यावा.

ड. त्यानंतर निविदाकार श्री. ए. लतिफ के. पटेल, मुंबई यांनी निविदा सुचनेमध्ये नमुद केलेल्या अटींपैकी अट क्र.८ नुसार प्रथमतः आवश्यक त्या कराचा भरणा करून त्याबाबतचा लेखी पुरावा या विभागाकडे सादर करावा. तसेच अट क्र.१२ नुसार सदर वाहनाबाबतच्या हस्तांतरण नोंदणीबाबत सर्व प्रक्रिया स्वखर्चाने पूर्ण करावी.

इ. सदरहू सर्व प्रक्रिया पूर्ण केल्यानंतर विधानभवन परिसराच्या आवारात ठेवण्यात आलेले वाहन जसे आहे त्या स्थितीत घेऊन जाण्यासाठी त्यांना मान्यतेचे प्राधिकारपत्र सुपूर्द करण्यास आणि त्यानंतर वाहन श्री. ए. लतिफ के. पटेल, मुंबई यांचे ताब्यात देण्यास याअन्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक डीएफपी १०१६/ प्र.क्र.०७/ १६/ विनियम दिनांक २२.६.२०१६ मधील परि. ३ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकरांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१५१२३३४४२५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, serialNumber=b469b3fd61b5201f03b702c0f7fd0ec5cf18beb12425455f4856f44e3d4da763, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2020.09.15 12:35:09 +05'30'

**( सं.छ.तडवी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

प्रत उचित कार्यवाहीसाठी :-

कार्यासन अधिकारी (रोखशाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई

**प्रत :-**

१. मा.अपर मुख्य सचिव (अल्पसंख्याक विकास विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक
२. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई ४०००३०,
३. वित्त विभाग, (व्यय-४)/विनियम, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
४. श्री. अब्दुल लतीफ पटेल, १४/४६ बारा-इमाम रोड, पहिला मजला, रुम नं.१६, मुंबई ४०० ००३
५. श्री.विनायक संभाजी पांगे, बि,४०८, निसर्ग सोसायटी, परेल १२.
६. निवडनस्ती का.३